**कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेमध्ये अंशत: बदल करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस ११२२/प्र.क्र. २४७/२०२२/आ (वर्ग-१)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : १७ ऑगस्ट, २०२३.

**वाचा :** शासन आदेश, जलसंपदा विभाग, समक्रमांक, दिनांक २०.०९.२०२२ व ०२.०३.२०२३.

**शासन आदेश:-**

कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील श्री.आण्णाराव अर्जुन कांबळे, कार्यकारी अभियंता यांच्या दि. २०.०९.२०२२ च्या आदेशान्वये देण्यात आलेल्या पदस्थापनेमध्ये उपरोक्त संदर्भाधीन दि. ०२.०३.२०२३ च्या आदेशान्वये अंशत: बदल करुन सुधारित पदस्थापना सहायक मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक या रिक्त पदावर करण्यात आली होती.

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीस अनुसरुन व सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने प्रशासकीय कारणास्तव श्री.आण्णाराव अर्जुन कांबळे, कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांना दिनांक ०२.०३.२०२३ रोजीच्या आदेशान्वये देण्यात आलेल्या पदस्थापनेमध्ये अंशत: बदल करुन त्यांची सुधारित पदस्थापना खाली दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | याअगोदर पदस्थापना दर्शविण्यात आलेले पद | सुधारीत पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|
| १. | श्री. आण्णाराव अर्जुन कांबळे | सहायक मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक. | कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, हिंगोली. |

३. श्री.आ.अ. कांबळे, कार्यकारी अभियंता यांची सदर पदस्थापना त्यांच्या विनंतीनुसार करण्यात येत असल्याने त्यांना सदर पदावर रुजू होण्याबाबतचे अनुषंगिक लाभ देय होणार नाहीत.

४. श्री. कांबळे, कार्यकारी अभियंता यांना कळविण्यात येते की, सदर आदेशानुसार अंशत: बदलीने पदस्थापना दिलेल्या पदावर तात्काळ रुजू व्हावे. तसेच संबंधित मुख्य अभियंता यांनी, वरील पदस्थापना दर्शविलेले कार्यकारी अभियंता हे पदस्थापनेच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास **doesttclass1.wrd@maharashtra.gov.in** या ई-मेल संकेतस्थळावर त्वरित कळवावे.

५. सदरहू आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून नियुक्ती रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. संबंधीत अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

७. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०८१७१५१२४३३८२७ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे. तसेच, सदर शासन आदेश, जलसंपदा विभागाच्या www:/wrd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAKHI SACHIN CHAVAN

Digitally signed by RAKHI SACHIN CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=7206b9312f3f73ff523e7a493d6d53d819f5c15336ff9a16ada11a287b879985, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=75AA5A95E2FE606BB64628D64D984EA9D651466BF93A6A2C44EEC93DF9207974, cn=RAKHI SACHIN CHAVAN
Date: 2023.08.17 15:14:07 +05'30'

**( राखी चव्हाण )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव (लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.
६. महालेखापाल, महाराष्ट्र १/ २ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), मुंबई/ नागपूर.
७. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद.
८. मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक.
९. संबंधीत अधिकारी.
१०. संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
११. कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.